**मुंबई लगत अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराज यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारणे-**
**प्रकल्प कार्यालयासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून विद्युत जोडणी व जलवाहीनी जोडणी शुल्कास प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्मारक-३११६/३४७/प्र.क्र.१८५/२९**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक: १ जून, २०१७.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः स्मारक-३११६/अनौसं-२/प्र.क्र.३०/२९, दिनांक ३ फेब्रुवारी, २०१६.
२) अधीक्षक अभियंता, मुंबई (सा. बां) मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.अअ/मुंमं/प्रलि/बजेट/२९५५, दिनांक १२ एप्रिल, २०१६.
३) अधीक्षक अभियंता, मुंबई (सा. बां) मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. काअ/एघ/प्रशा-२/१८३०, दिनांक ६ मे, २०१६.

**प्रस्तावना :-**

मंबई लगत अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे स्मारक उभारण्याच्या अनुषंगाने तात्पुरत्या स्वरूपाच्या प्रकल्प कार्यालयाच्या बांधकामास उपरोक्त नमूद संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. या प्रकल्प कार्यालयाच्या बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून विद्युत जोडणीसाठी रू. १,४०,८२९/- व जलवाहीनी जोडणीच्या कामासाठी रू. २,२०,०००/- असे दोन्ही मिळून एकूण रू. ३,६०,८२९/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक अधीक्षक अभियंता, मुंबई (सा.बां) मंडळ, मुंबई यांनी उपरोक्त नमूद अनुक्रमे संदर्भ क्र. २ व ३ अन्वये सादर केले होते. सदर अंदाजपत्रकांची छाननी करून सार्वजनिक बांधकाम विभागाने रू. ३,४३,४२९/- इतक्या अंदाजित खर्चाच्या अंदाजपत्रकास सहमती दिली आहे. सदर खर्चास प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई लगतच्या अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराज यांच्या आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याच्या अनुषंगाने कफ परेड भागात प्रकल्प कार्यालय उभारण्यात आलेले आहे. सदर प्रकल्प कार्यालयाच्या विद्युत कामासाठी व बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून जलवाहीनी जोडणीच्या कामासाठी एकूण रू. ३,४३,४२९/- (अक्षरी रूपये तीन लाख त्रेचाळीस हजार चारशे एकोणतीस फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत असून सदर निधी खर्चासाठी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी उप अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज स्मारक प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुलाबा, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी (संकेतांक क्र. ७१०१००३४७३ ) व अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर, मुंबई यांना नियंत्रकीय अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरीत झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी अधिक्षक अभियंता, मुंबई (सां.बा.), मंडळ, मुंबई यांची राहील.

२. या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक ए-९, लेखाशीर्ष ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१, कार्यालयीन इमारत ०५१ बांधकाम, राज्य योजनातंर्गत योजना (००)(०१) अरबी समुद्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे स्मारक उभारणे(४०५९ २५२१) ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ३१२/१६/इमा-३, दिनांक ६/६/२०१६ तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. २९९/२०१७/व्यय-४, दिनांक २७/४/२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.१, सार्वजनिक बांधकाम विभाग नियमपुस्तिकेतील परि.क्र.१३४ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील निधी वितरीत करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील परिच्छेद क्र. ७ व परिच्छेद क्र.८ येथे नमूद अटींची पूर्तता होते. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. ९ ते १८ येथील अटी या प्रयोजनार्थ लागू होत नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०११५४६२७७७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Krishna Bhosale

Digitally signed by Sanjay Krishna Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68fad25d7626a3cc798a2cdee2480a108e46d2bc3c24f98d38cc78723fe79c0f, cn=Sanjay Krishna Bhosale
Date: 2017.06.01 15:48:12 +05'30'

**(सं.कृ. भोसले)**
उप सचिव

**प्रत,**

१.मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२.मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
३.अपर मुख्य सचिव, (र.व का.),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
५.सचिव (बांधकामे),सार्वजनिकबांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६.मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभाग,२५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ०७१,
७.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
११.अधिक्षक अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, मुंबई बांधकाम मंडळ, प्रशासकीय इमारत, २रा मजला, रामचंद्र चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०० ०७१,
१२.कार्यकारी अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बी.बी.आर.एस.कं.५, भूखंड क्र.१२०,झूलेलाल मंदिराशेजारी, कफ परेड, कुलाबा, मुंबई,
१३. उप अभियंता, छत्रपती शिवाजी महाराज प्रकल्प विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग,

बी.बी.आर.एस.कं.५, भूखंड क्र.१२०,झूलेलाल मंदिराशेजारी, कफ परेड, कुलाबा, मुंबई,
१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६.अवर सचिव (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४ ), मंत्रालय, मुंबई
१८.सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५ ), मंत्रालय, मुंबई
१९.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३),मंत्रालय,मुंबई,
२०.निवड नस्ती ( कार्यासन-२९) सा.प्र.विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.